**भिमा व कृष्णा खोऱ्यात सन २०१९ मध्ये उद्भवलेल्या पूरपरिस्थितीची कारणे शोधणे व भविष्यकालिन उपाययोजनात्मक अहवाल तयार करण्यासाठी स्थापित अभ्यास समितीस दि. ३१ मार्च, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र:- पूरनि-२०१९/प्र.क्र.२९१/२०१९/सिं.व्य.(म).**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२२

**वाचा:-** १) महसूल व वन विभागाचे पत्र क्र. सीएलएस २०१९/ प्र.क्र.१६५/ म-३. दि.२०.०८.२०१९.
२) शासन निर्णय क्र -:पूरनि /२०१९ -प्र.क्र.२९१ /२०१९/सिं.व्य.(म), दि. २३.०८.२०१९.
३) शासन निर्णय क्र -:पूरनि /२०१९ -प्र.क्र.२९१ /२०१९/सिं.व्य.(म), दि. ०१.११.२०१९.
४) शासन निर्णय क्र -:पूरनि-२०२०/प्रक्र.१४५/२०२०/सिं.व्य.(म) दि.२७.०१.२०२१.
५) शासन निर्णय क्र.पूरनि-२०१९/प्र.क्र.२९१/२०१९/सि.व्य.(म) दि.०४.०३.२०२१.

**प्रस्तावना :-**

सन २०१९ च्या पावसाळ्यात जुलै व ऑगस्ट महिन्यामध्ये कृष्णा खोऱ्यात अति पर्जन्यमानामुळे अभूतपूर्व पूर परिस्थिती उद्भवली होती. विशेषत: सांगली व कोल्हापूर जिल्हे मोठ्या प्रमाणात बाधित झाले. मोठ्या प्रमाणामध्ये जीवित व वित्त हानी झाली. पुराच्या कारणांबाबत विविध स्तरावरुन मत - मतांतरे व्यक्त होत आहेत. सन २०१९ मध्ये निर्माण झालेली पूर परिस्थिती अधिकच गंभीर होती. कर्नाटक राज्यातील अलमट्टी धरणाचे कामही ५१९.६० मीटर तलांकापर्यंत पूर्ण झालेले आहे. तसेच दोन्ही राज्यातील इतर जलसंपदा प्रकल्पही पूर्णत्वास आलेले आहेत. यात अनेक तांत्रिक गुंतागुंतीच्या बाबी आहेत. उपग्रहाद्वारे दूरसंवेदन माहिती प्रणालीत मोठ्या प्रमाणात प्रगती झालेली आहे. त्याचा वापर करणेदेखील आवश्यक आहे. या सर्व बाबींचे सखोल तांत्रिक अन्वेषण करुन पूर परिस्थितीची कारणे शोधणे, भविष्यात अशा दुर्दैवी घटनांची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी उपाययोजना शोधणे याकरिता (MRSAC), भारतीय हवामान विभाग (IMD), भारतीय प्रौद्योगिक संस्था (IIT), महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (MWRRA), जलक्षेत्रातील विश्लेषक अशा तज्ञ अभ्यास समिती स्थापन करणेबाबत वरील संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयानुसार समितीची स्थापना करण्यात आली. तसेच वरील संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयानुसार समितीमधील अशासकिय सदस्यांच्या मानधनाबाबत निर्णय घेण्यात आला आहे. संदर्भ क्र. ४ अन्वये सुधारित समिती स्थापन करण्यात आली आहे.

सदर समितीने भीमा व कृष्णा खोऱ्यांपैकी कृष्णा उपखोऱ्याचा अभ्यास अहवाल दिनांक २७ मे, २०२० रोजी शासनास सादर केला आहे. तसेच भिमा खोऱ्याचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये समितीस दि.३०/०६/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. तथापि, भिमा खोऱ्याचा पाणलोट क्षेत्राचा पसारा कृष्णा खोऱ्याच्या तुलनेत मोठा असून जलशास्त्रीय व भौगोलिक माहिती प्राप्त करण्यास अधिक वेळ लागत आहे. तसेच कोविड-१९ च्या पसरलेल्या संसर्गजन्य रोग व निर्बंधांमूळे पूर अभ्यास समितीस भिमा खोऱ्याचा अभ्यास पूर्ण करण्यासाठी पुरेसा वेळ न मिळाल्याने, समितीच्या अध्यक्षांनी केलेल्या विंनती नुसार भिमा खो-याचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी समितीस दि.३१/०३/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

उपरोक्त समितीने आतापर्यंत बैठकीद्वारे पर्जन्यमान व अतिवृष्टीचा इशारा, एकात्मिक जलाशय परिचालन, आपत्कालीन कृती आराखडा व यंत्रणा, पूर नियंत्रण व अनुमान यासाठी नवीन तंत्रज्ञान व आज्ञावलीचा वापर इत्यादी आयामांचा अभ्यास करून व दिनांक २३ व २४ सप्टेंबर २०१९ रोजी सांगली व कोल्हापूर जिल्ह्यातील पूर बाधित भागाचा दौरा करून कृष्णा उपखोऱ्याचा अभ्यास अहवाल दिनांक २७ मे, २०२० रोजी शासनास सादर केला आहे. तथापि, भिमा खोऱ्याचा पाणलोट क्षेत्राचा पसारा कृष्णा खोऱ्याच्या तुलनेत मोठा असून जलशास्त्रीय व भौगोलिक माहिती प्राप्त करण्यास अधिक वेळ लागत आहे. तसेच कोविड-१९ च्या पसरलेल्या संसर्गजन्य रोग व निर्बंधांमूळे पूर अभ्यास समितीस भिमा खोऱ्याचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी पूरेसा वेळ न मिळाल्याने, उपरोक्त समितीस भिमा खोऱ्याचा अभ्यास करुन परिपूर्ण व अंतिम अहवाल सादर करण्यासाठी दिनांक ३१/०३/२०२२ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे. या कालावधीनंतर समितीस मुदतवाढ मिळणार नाही.

सदरहू आदेश नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१७२/२०२१/१४३३ दिनांक २२/०९/२०२१ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३६३/२०२१/व्यय-१२ दि.२१/१०/२०२१ च्या सहमती नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२९१५३४४३६९२७ असा असून डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2bf9216e9c82a387001366ade405f96dced8f883099a0df6eda6dcc4a3cecb0, serialNumber=64cd9fc7921db221846e464a04d2971a520aa1ed7e728a92a64c735ef2ea7cc9, cn=Vaijnath Manmathappa Chille
Date: 2022.03.29 15:41:22 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई,
६. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
७. अ.मु.स. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई व नागपूर,
९. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ पुणे,
१३.मुख्य अभियंता, (जसं ) जलसंपदा विभाग,पुणे.
१४. सर्व समिती सदस्य यांचे मार्फत.
१५. सिं.व्य. (म.) संग्रहार्थ.